**श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास समिती, प्रभादेवी, मुंबई या आस्थापनेवर अतिरिक्त पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.एसव्हीटी -२०१४/११६/प्र.क्र.२६/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २५ जून, २०१८.**

**संदर्भ:-**
१. विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.एसव्हीटी-२००२/५५५/प्र.क्र.१२१/सोळा, दि.०४.०८.२००९.
२. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास,प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगमं /१५२७/२०१३, दि.१६.१०.२०१३
३. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगमं /२५२३/२०१४, दि.१५.०२.२०१४
४. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास,प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगमं /३३४०/२०१४, दि.३०.०६.२०१४
५. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास,प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगमं /७३/२०१८, दि.२०.०४.२०१८

**<u>प्रस्तावना</u> :-**

विधि व न्याय विभाग,शासन निर्णय दि.०४.०८.२००९ अन्वये न्यासासाठी १५८ पदांचा आकृतीबंध मंजुर करण्यात आला आहे. सन २००९ नंतर न्यासाच्या कामकाजात मोठ्या प्रमाणात वाढ झाली असून दर्शनासाठी येणाऱ्या भाविकांची संख्या, न्यासाचे उत्पन्न, न्यासाचे लोककल्याणकारी उपक्रम, पूजा नोंदणी, पुजेचे प्रकार, लाडू उत्पादन इ. कामकाजात प्रचंड वाढ झाली आहे. यास्तव न्यासाचे दैनंदिन काम सुरळीतपणे पार पाडण्यासाठी, भाविकांना सुलभरितीने दर्शन उपलब्ध करुन देण्यासाठी, न्यासाच्या विविध कल्याणकारी उपक्रमांचे कामकाज विहित कालमर्यादेत पार पडावे यासाठी अतिरिक्त कर्मचाऱ्यांच्या सेवेची आवश्यकता आहे.कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या संदर्भीय पत्रांन्वये न्यास आस्थापनेवरील कामकाजात वाढ झाल्यामुळे अतिरिक्त पदे निर्माण करण्याची विनंती केली होती. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांनी केलेल्या विनंतीनुसार न्यासाच्या आस्थापनेवर अतिरिक्त पदे निर्माण करुन सुधारित आकृतीबंध मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर विश्वस्त व्यवस्था (प्रभादेवी) अधिनियम, १९८० च्या कलम १४ (२) अन्वये श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई या न्यासाच्या कामकाजात मोठ्या प्रमाणात वाढ झाल्यामुळे या आस्थापनेवर खालीलप्रमाणे अतिरिक्त १३३ पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | संवर्ग | वेतनश्रेणी | मंजूर संख्या | अतिरिक्त निर्माण केलेली पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक पर्यवेक्षक | रु.९३००-३४८००+ग्रे.पे.४२०० | ०३ | ०१ |
| २ | भांडारपाल | रु.९३००-३४८००+ग्रे.पे.४२०० | -- | ०१ |
| ३ | वीजतंत्री (वायरमन) | रु.५२००-२०२००+ग्रे.पे.१९०० | ०३ | ०३ |
| ४ | पुजारी | रु.५२००-२०२००+ग्रे.पे.१९०० | २० | १३ |
| ५ | सफाई कामगार | रु.४४४०-७४४०+ग्रे.पे.१३०० | २० | ०७ |
| ६ | महिला कामगार | रु.४४४०-७४४०+ग्रे.पे.१३०० | ०३ | ०८ |
| ७ | सर्वसामान्य कामगार | रु.४४४०-७४४०+ग्रे.पे.१३०० | १५ | ५४ |
| ८ | पहारेकरी | रु.४४४०-७४४०+ग्रे.पे.१३०० | २७ | ४६ |
| | | | **नव्याने निर्माण करावयाची एकूण पदे** | **१३३** |

२. उपरोक्त प्रमाणे निर्माण करण्यात आलेल्या नवीन पदांस श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यासाच्या आकृतीबंधास मंजुरी दिलेल्या विभागाच्या दि.०४.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती लागू असतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२५१५२७१६०२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.06.25 15:36:59 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति:-**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अध्यक्ष, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई
४. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई
५. निवड नस्ती/का.१६